**सातवा वेतन आयोग शिक्षक आणि शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दि. १.१.२०१६ ते ३१.१२.२०१८ या कालावधीमधील सातवा वेतन आयोगानुसार सुधारीत वेतनाची अनुज्ञेय थकबाकी अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास वर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः विभशा-२०१९/प्र.क्र.२४८/विजाभज-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-३२.
दिनांक : २७ जानेवारी, २०२०

वाचा:- १. शासन निर्णय वित्त विभाग क्र.वेपुर-२०१८/प्र.क्र.४४/सेवा-९ दि.०१.०१.२०१९
२. शासन अधिसूचना वित्त विभाग क्र.वेपुर-२०१९/प्र.क्र.०१/सेवा-९ दि.३०.०१.२०१९
३. शासन परीपत्रक वित्त विभाग क्र.वेपुर-२०१९/प्र.क्र.०९/सेवा-९ दि.२०.०२.२०१९
४. शासन निर्णय क्रमांकः इमाव साशैमाप्र विजाभज व विमाप्र कल्याण,विभशा-२०१८/ प्र.क्र.१८४/विजाभज-२,दि.०५.०९.२०१८
५. शासन निर्णय क्रमांकः इमाव साशैमाप्र विजाभज व विमाप्र कल्याण,विभशा-२०१९/ प्र.क्र.२४८/विजाभज-२ दि.२९.०७.२०१९
६. शासन निर्णय क्रमांक: वेतन -१२१९/प्र.क्र.१०५ /टिएनटी-३ दि.१०.०१.२०२०

प्रस्तावना:-

विमुक्त जाती भटक्या जमाती विशेष मागासवर्ग व उसतोड कामगारांच्या मुलांसाठीच्या प्राथमिक व माध्यमिक तसेच विद्यानिकेतनमधील प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळांमधील पुर्णवेळ शिक्षक आणि शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना संदर्भ क्र.०५ येथील शासन निर्णयान्वये सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्यात आलीआहे. तसेच शिक्षक आणि शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दि. १.१.२०१६ ते ३१.१२.२०१८ या कालावधीमधील सातवा वेतन आयोगानुसार सुधारीत वेतनाची अनुज्ञेय थकबाकी अदा करणेबाबत शालेय शिक्षण विभागाच्या संदर्भ क्र.०६ येथील शासन निर्णयातील तरतुदी या विभागास लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शिक्षक आणि शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दि. १.१.२०१६ ते ३१.१२.२०१८ या कालावधीमधील सातवा वेतन आयोगानुसार सुधारीत वेतनाची अनुज्ञेय थकबाकी अदा करणेबाबत शालेय शिक्षण विभागाच्या दि.१०.०१.२०२० रोजीच्या शासन निर्णयामध्ये उल्लेखित तरतुदींपैकी स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविल्या जाणाऱ्या अनुदानित आश्रमशाळांसाठी लागू असतील त्या तरतुदी या

विभागाच्या विमुक्त जाती भटक्या जमाती विशेष मागासवर्ग व उसतोड कामगारांच्या मुलांसाठीच्या प्राथमिक व माध्यमिक तसेच विद्यानिकेतनमधील प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळांसाठी लागू करण्यात येत आहेत. शालेय शिक्षण विभागाच्या दि.१०.०१.२०२० रोजीच्या शासन निर्णयास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. यास्तव, विमुक्त जाती भटक्या जमाती विशेष मागासवर्ग व उसतोड कामगारांच्या मुलांसाठीच्या प्राथमिक व माध्यमिक तसेच विद्यानिकेतनमधील प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळांमधील पुर्णवेळ शिक्षक आणि शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना देय होणाऱ्या थकबाकीची रक्कम सदरहू शासन निर्णयात नमूद कार्यपद्धती प्रमाणे लागू करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२८१५५६०२०४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2020.01.28 15:57:36 +05'30'

**( भा. र. गावित )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री, विजाभज इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव.
५. मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहायक.
६. मा. अप्पर मुख्य सचिव वित्त विभाग यांचे स्वीय सहायक.
७. मा. अप्पर मुख्य सचिव नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक.
८. मा. प्रधान सचिव विजाभज इमाव व विमाप्र कल्याण विभाग.
९. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र मुंबई
१०. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई.
११. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र मुंबई
१२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई.
१३.संचालक, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग सर्व
१५. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण सर्व

१६. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद सर्व

१७. अध्यक्ष / सचिव विजाभज, विमाप्र, उसतोड कामगरांच्या मुलांसाठीच्या आश्रमशाळा व विद्यानिकेतन व इतर आश्रमशाळा

१८. मुख्याध्यापक प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक आश्रमशाळा महाराष्ट्र राज्य

१९. निवड नस्ती (विजाभज-२).